आदिवासी क्षेत्राच्या प्रशासनाचे
बळकटीकरण - कर्मचारी विषयक धोरण.
भाडेमाफ निवासस्थानाच्या सवलतीबाबत...

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : आस्था- १७०१/प्र.क्र.४३/का.१५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ६ मे, २००२.

**वाचा** : १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५, दिनांक ९ मार्च, १९९०

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. आस्था-१०९३/प्र.क्र.२४५/९३/का.१५, दिनांक २९ डिसेंबर,१९९३.

३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. आस्था-१०९९/प्र.क्र.१२३/का.१५, दिनांक २३ मे, २०००.

**शासन निर्णय** :- प्रस्तावनेतील अ.क्र. २ येथील दिनांक २९.१२.९३ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ , अ.क्र.१ अन्वये घोषित केलेल्या ११ संवेदनशिल एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प क्षेत्रात नियुक्त होणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांना संवेदनशिल प्रकल्प क्षेत्रात नेमले जाण्यापूर्वी ते ज्या ठिकाणी कार्यरत होते त्या ठिकाणी शासकीय निवासस्थानाचा वापर करीत असल्यास ते निवासस्थान त्यांच्या कुटुंबियांना राहण्या व वापरण्यासाठी ताब्यात ठेवण्याची मुभा त्याच शासन निर्णयातील परिच्छेद १(३) अन्वये त्यांना देण्यात आली असून संवेदनशिल प्रकल्पातील नेमणूकीच्या ठिकाणी भाडेमाफ शासकीय निवासस्थान देण्याची आणि शासकीय निवासस्थान उपलब्ध न झाल्यास त्या ठिकाणी शासन नियमानुसार मिळणारा घरभाडे भत्ता देण्याची सुविधा मंजूर करण्यात आली आहे.

२. तथापि भाडेमाफ निवासस्थानाची सुविधा सरसकट सर्व संवेदनशिल प्रकल्प क्षेत्रातील अधिकारी/कर्मचारी यांना लागू केल्याने आदिवासी क्षेत्रात असलेल्या कोणत्याही गैरसोयी न सोसता शहरी विभागातील कर्मचारीही ह्या सुविधेचा लाभ घेत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे यासंबधात आता पुढीलप्रमाणे स्पष्टीकरण करण्यात करण्यात येत आहे.

३. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५, दिनांक ९ मार्च, १९९० अन्वये राज्यातील आदिवासी उपयोजना क्षेत्र व अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्र घोषित करण्यात आले आहे. दिनांक ९ मार्च, १९९० च्या आदेशान्वये घोषित केलेल्या आदिवासी उपयोजना/अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रातील जी गांवे/शहरे संवेदनशिल ११ प्रकल्पांच्या कार्यक्षेत्रात समाविष्ट आहेत, त्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील / अतिरिक्त आदिवासी उपयोजना

क्षेत्रातील गांवे व शहरांत मुख्यालय असलेल्या कार्यालयात बदलीने नियुक्त झालेल्या शासकीय व जिल्हापरिषदेतील अधिकारी/कर्मचारी ( आदिवासी विकास विभागाच्या आस्थापनेवरील कर्मचारी वगळून) यांनाच भाडेमाफ निवासस्थानाची सुविधा अनुज्ञेय राहिल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ.नि. कुलकर्णी)
शासनाचे उप सचिव